राज्यस्तरीय वार्षिक योजना २०१६-१७ (लेखाशीर्ष २२०५ ३०५४) मध्ये अर्थसंकल्पीत निधीतून प्रस्तावित खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: मराग्रं २५२७/प्र.क्र.२६३/२०१६/साशि ५**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२**
दिनांक - ०५ जानेवारी, २०१७

**संदर्भ**- १) शासननिर्णय क्र मातंसं १७१६/प्र.क्र.२८६/३९, दि.०९/०८/२०१६
२) शासन निर्णय क्र. भांखस- २०१४/प्र.क्र.८२/भाग III/उदयोग ४, दि. १/१२/२०१६
३) उच्च व तंत्र शिक्षण विभाग पत्र क्र मराग्रं २५११/प्र.क्र.२४३/२०१६/साशि ५, दि. २९/११/२०१६
४) ग्रंथालय संचालनालयाचे पत्र क्र ३४/राखस/२०१६-१७/१२२४८, दि. २३/१२/२०१६

**प्रस्तावना -**

राज्यस्तरीय वार्षिक योजना २०१६-१७ मध्ये योजनेत **"ग्रंथालय संचालनालय आणि सहाय्यक ग्रंथालय संचालक कार्यालयांचे संगणकीकरण"** लेखाशिर्ष (२२०५ ३०५४ ) अंतर्गत रु. २४०.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. सन २०१६-१७ मध्ये (२२०५ ३०५४) या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित निधीतून ग्रंथालय संचालनालयाचे मुख्यालय व अधिनस्त असलेल्या ६ सहाय्यक ग्रंथालय संचालक कार्यालयांसाठी संगणक व साधनसामुग्री खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत संदर्भ क्र ४ च्या पत्रान्वये प्रस्ताव प्राप्त झालेला आहे. त्यानुसार सदर साहित्य खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासननिर्णय -**

ग्रंथालय संचालनालयाचे मुख्यालय व अधिनस्त असलेल्या ६ सहाय्यक ग्रंथालय संचालक कार्यालयांसाठी संगणक व साधनसामुग्री खरेदी करण्यासाठी खालील तक्त्यामध्ये नमूद केल्याप्रमाणे साहित्य खरेदी करण्यास शासन मंजूरी देत आहे.

| अ.क्र. | साहित्याचे नाव | अंदाजे किंमत (१ वस्तू) | संख्या | एकूण किंमत | वित्तीय नियमक्र. |
|---|---|---|---|---|---|
| १ | आयपॅड (Apple) | ५०,०००/- | १ | ५०,०००/- | उपविभाग-दोन अ.क्र. २७-अ, नियम क्र.७६ |
| २ | लॅपटॉप (Dell/HP) | ६०,०००/- | १ | ६०,०००/- | |
| ३ | संगणक संच (Dell/HP) | ४०,०००/- | २२ | ८,८०,०००/- | |
| ४ | लेसर प्रिंटर (Canon/HP) | १५,०००/- | २२ | ३,३०,०००/- | |
| ५ | स्कॅनर (HP) | १५,०००/- | ६ | ९०,०००/- | |
| ६ | यूपीएस इन्व्हर्टर | ४०,०००/- | ६ | २,४०,०००/- | |
| ७ | USB External Hard Discs १TB Capacity | ८,०००/- | ४ | ३२,०००/- | २७ ब, नियम क्र. ७६ |
| ८ | फॅक्स मशिन्स | १५,०००/- | ३ | ४५,०००/- | २७-क, नियम क्र.७६ |
| | **एकूण** | | | **१७,२७,०००/-** | |

सदरचा खर्च हा " मागणी क्र. डब्ल्यू -४ २२०५, कला व संस्कृती,१०५, सार्वजनिक ग्रंथालये, (०३)(०८) ग्रंथालय संचालनालय आणि सहाय्यक ग्रंथालय संचालक कार्यालयांचे संगणकीकरण (२२०५ ३०५४), १७- संगणक खर्च, २१- पुरवठा व सामग्री " या लेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात यावा.

राज्यस्तरीय वार्षिक योजना २०१६-१७ मध्ये "**ग्रंथालय संचालनालयआणि सहाय्यक ग्रंथालय संचालक कार्यालयांचे संगणकीकरण**"लेखाशिर्ष (२२०५ ३०५४) अंतर्गत रु. २४०.०० लक्ष इतकी तरतूद करण्यात आलेली आहे. सदर खर्च करण्यास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे -

१) सदरहू यंत्रसामग्री व साधनसामग्री यांची आवश्यकता/मागणी यांची शहानिशा/ खातरजमा करण्यात यावी.

२) सदरहू यंत्रसामग्री व साधनसामग्री यांचे तांत्रिक विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी व त्यानंतरच या बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रसिध्द करण्यात यावी.

३) सदर यंत्रसामग्री व साधनसामग्री कार्यन्वित करण्यासाठी आवश्यक तांत्रिक मनुष्यबळ व अन्य सुविधा उपलब्ध असल्याची खात्री करण्यात यावी. तसेच सदर यंत्रसामग्री व साधनसामग्री विनावापर पडून राहणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

४) शासननिर्णय , उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस २०१४/प्र.क्र.८२/भाग III/उदयोग ४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारित नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

५) शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांक विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग २, दि. १७/०४/२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग - पहिला, उपविभाग दोन, अ.क्र. ४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६) संगणक, प्रिंटर्स व स्कॅनर इत्यादीची खरेदी माहिती व तंत्रज्ञान विभागाने स्थापन केलेल्या महामंडळाकडून करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in यासंकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०१०६१३०१०३७००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Suvarna Hemchandra Patankar

Digitally signed by Suvarna Hemchandra Patankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Edu, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed71ebecc5e77faa2bc326ad6465ee69e8ce4b095cb873186b176c646b34cc28, serialNumber=3740f7b9e520ea4fc9d0c8cae45a7132db5b499301d6caff46360639be7adc8b, cn=Suvarna Hemchandra Patankar
Date: 2017.01.06 13:05:36 +05'30'

**( सु. हे. पाटणकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. राज्य मध्यवर्ती ग्रंथालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १, मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
६. निवडनस्ती ( साशि ५)